अशासकीय अनुदानित संस्थांमधील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना ६ वा वेतन आयोगानुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू केल्यामुळे थकबाकीकरीता तसेच सुधारित महागाई भत्यापोटी लागणारी तरतूद वितरीत व खर्च करण्यांस मंजूरी देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक- अर्थसं-२०१०/(२९६/१०)/व्यशि-२ अर्थसं.,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २८ जानेवारी, २०११

**संदर्भ :-** प्र.संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : ५/अर्थसं/२२०३/२०१०/१५४, दिनांक २८ सप्टेंबर,२०१०.

**प्रस्तावना :-** व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातर्गत एकूण १२७८ अशासकीय अनुदानित संस्था कार्यरत असून, त्यामध्ये ९५४३ शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचारी कार्यरत आहेत.

२. उच्च व तंत्र शिक्षण विभागाचा शासन निर्णय दिनांक २७ ऑगस्ट, २००९ अन्वये अशासकीय अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा/केंद्रे तथा कनिष्ठ महाविद्यालयांमधील व्यवसाय अभ्यासक्रमांच्या (पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम, +२ स्तरावरील द्विलक्षी व उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम) शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना ६ व्या वेतन आयोगानुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यांत आलेली आहे. अशासकीय अनुदानित संस्थांमधील कर्मचाऱ्यांना ६ व्या वेतन आयोगानुसार अनुज्ञेय थकबाकी व दिनांक ०१/०६/२०१० पासून मंजूर झालेल्या महागाई भत्त्याचा खर्च भागविण्यासाठी वित्तीय वर्ष सन २०१०-२०११ या वर्षाकरीता मंजूर करण्यांत आलेली तरतूद अपुरी असल्याने रूपये २०.७५ कोटी इतक्या खर्चाची पुरवणी मागणी हिवाळी अधिवेशन डिसेंबर,२०१० मध्ये मंजूर करण्यांत आली.

३. सन २०१०-११ या वर्षाचे खर्चाचे पुरक विवरणपत्र दि.०१ डिसेंबर, २०१० रोजी विधानमंडळास सादर करण्यांत आले. या पुरवणी खर्चास विधानमंडळाने मान्यता दिलेली आहे. दि. ३१/३/२०११ रोजी संपणा-या वित्तिय वर्षाच्या विनियोजनामध्ये समाविष्ट करण्यासाठी (पुरवणी) विनियोजन विधेयकास मा. राज्यपालांनी संमती दिलेली आहे. आणि ते महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२५ ) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दि. १० डिसेंबर २०१० यामध्ये प्रसिध्द करण्यांत आलेले आहे.

३. सदरच्या प्रस्तावासाठी मंजूर करण्यांत आलेली रु.२०.७५ कोटी (वीस कोटी पंच्याहत्तर लाख फक्त) अर्थसंकल्पित तरतूद वितरित करण्यांस व त्याकरिता लागणा-या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** उपरोक्त पार्श्वभूमीवर आता, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील अशासकीय अनुदानित संस्थांमधील कर्मचाऱ्यांना ६ व्या वेतन आयोगानुसार अनुज्ञेय थकबाकी व दि.०१/०६/२०१० पासून मंजूर झालेल्या महागाई भत्त्याचा खर्च भागविण्यासाठी डिसेंबर- २०१० च्या हिवाळी अधिवेशनात अर्थसंकल्पित झालेली तरतूद रु.२०.७५ कोटी **(रुपये वीस कोटी पंच्याहत्तर लाख फक्त)** वितरित करण्यांस खालील अटींस अधिन राहून या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यांत येत आहे.

सदरची तरतूद खालील अटींच्या अधिन राहून खर्च करण्यांत यावी.

१. नवीन बाबी / नवीन प्रयोजनासाठी या मंजूर तरतूदीतून खर्च करण्यांत येऊ नये.

२. ज्या प्रयोजनासाठी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यांत आलेली आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यांत यावी व तो मंजूर तरतूदीच्या मर्यादेत असावा.

२. सदर प्रस्तावातंर्गतचा खर्च प्रधान लेखाशिर्ष मागणी क्र.डब्ल्यू - ३, २२०३ तंत्र शिक्षण, १०४- अशासकीय तंत्र महाविद्यालये व संस्थांना सहाय्य, ०१ परिरक्षण अनुदाने, (०१)(०१) तंत्र व औद्योगिक शाळा, (२२०३ ०१४९) ३५ सहाय्यक अनुदाने (वेतन) योजनेत्तर या लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ मधील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.०७/११/व्यय-५, दि.०५.०१.२०११ व क्र.५६/११/अर्थ-८, दि.१८.०१.२०११ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदरहू शासन निर्णय हा शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक साकेतांक क्रमांक २०११०१२८१८३४०७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( शो. वि. पत्की )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति-

१. प्र.संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म. रा., मुंबई- १.
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर (संचालनालयामार्फत)
३. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र, मुंबई- १/ नागपूर- २.
४. महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र, मुंबई- १/ नागपूर- २.
५. अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई- ५१.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय (सर्व). (संचालनालयामार्फत)
७. कक्ष अधिकारी (व्यय-५/अर्थ-८), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
८. उच्च व तंत्र शिक्षण विभाग (साशि- १)
९. निवडनस्ती / व्यशि - २.